
ऐतिहासिक इमारती, किल्ले, मंदिरे यांची नवी ओळख
आधुनिक साधनांमधून आपल्याला प्राचीन कलाकृतींची पुनः निर्मिती करता येणे शक्य आहे काय?

- मुरुडेश्वर या कर्नाटक राज्यातील मंदिर रचनेचा आणि कार्ला लेण्यातील एका हत्तींच्या जोडीचा उपयोग या नमुन्याच्या कामासाठी वापरला आहे. त्या भव्य वास्तूच्या प्रवेशद्वारातील शोभा वाढवणाऱ्या वैभवशाली गजराजांची जोडी काळाच्या ओघात निस्तेज झाली तर तिला पुन्हा गतवैभवात आणायचा प्रयत्न संगणकाच्या मदतीने कसा करता येईल याचे ते प्रात्यक्षिक म्हणून उपयोग केला आहे.
- यात त्या मंदिरवास्तूंचा उपमर्द किंवा तिला उणेपणा आणायचा हेतू नाही.

एक प्रयत्न

- या तऱ्हेने आपल्याला अनेक किल्ले, गड, भवनांचे, कालमानाने उध्वस्त झालेल्या वास्तूंना पुन्हा त्यांच्या मूळ दिमाखात दर्शवायची मोहीम हाती घेतली तर आजचे पर्यटक, भाविक त्या ठिकाणी गेले असता सध्याच्या विद्रूप, भग्न, अवशेषांतून त्या भवनांचे मूळ रुप पाहून आनंदी होतील आणि अभिमानाने अनेकांना ती स्थळे पुन्हा नव्याने पहायला देश - विदेशातील पर्यटकांना प्रेरित करतील.

**वास्तूंचे मूळ रूपात सादरीकरण**



दर्शनीय भागातील भग्न गजराज





त्यांच्या मूळ दिमाखदार आवेशात



कार्ला चैत्यलेण्यातील सोंड गायब झालेला हत्ती



दुरुस्त केलेल्या हत्तीची सोंड

# आपल्याकडील किल्ले-गडांचे, वास्तूंचे मूळ दिमाखदार रुपात दर्शन घडवायला नको काय?

- यासाठी काय करावे लागेल?
- संगणक तज्ज्ञांची टीम तयार करणे. या कामात तरबेज कलाकार सध्या बिल्डरांकडे नव्या प्रकल्पांची त्रिमिती मॉडेल्स घडवण्याच्या कामात कार्यरत असतात. अशा कंपन्यांनी वेगवेगळया गडांच्या वास्तूंचे सादरीकरण करायला पुढाकार घेतला जाऊ शकतो.
- अनेक सेवाभावी संस्था, मोठ्या कंपन्यात समाजिक बांधिलकीसाठी अर्थिक सहाय राखून ठेवतात ते या कामासाठी उपयोगी पडेल.

- अनेक गडा-किल्ल्यावरील तोफा, आणि अन्य शस्त्रसामुग्रीचा प्रत्यक्ष वापर कसा केला जात असे याचे प्रात्यक्षिक करून त्यांची मारक शक्ती,पल्ला यावरून त्याकाळातील युद्धतंत्र, शस्त्र निर्मिती यांचा समावेश करून सध्याच्या पडीक गड-किल्याच्या त्यांच्या मुळरूपातील वास्तू कशा दिसत असाव्यात, हे कथन करणाऱ्या १०-१५ मिनिटांच्या चित्रफीती तयार करता येईल.
- पर्यटनाला आलेल्या गडप्रेमींपासून ते सामान्य प्रेक्षकांसाठी त्या चित्रफिती पहायची सोय प्रवेशद्वारापाशी करता येईल. त्यासाठी काही माफक फी ठेवता येईल. शिवाय अनेक वस्तुसंग्रहालये, प्राणी संग्रहालये, शाळा, विश्वविद्यालये, शासकीय व गैर शासकीय संस्थांना प्रदर्शनासाठी अशा चित्र फिती उपलब्ध करून देता येतील.

## सैनिक पर्यटनासाठी

- काही गडांवरील ऐतिहासिक घटनांच्या संदर्भात केले गेलेले चढायातील नियोजन, कामगिरी फत्ते होण्याची किंवा न होण्याची कारणे, आज त्याच मोहिमा पुन्हा करायच्या झाल्या तर त्या कशा पार पाडता येईल? यावर सैन्यातील तज्ज्ञांकरवी अनेक माहितीपूर्ण चित्रफिती तयार करता येईल. उदा. जंजीरा, सिंहगड जिंकायची कारवाई, अफजलखान, सिद्दी जोहर, शाहिस्तेखान आदींच्या युद्धनीती, सैन्याला लागणाऱ्या रसद, शस्त्रास्त्रांची निर्मिती, हत्ती, घोडे, उंट या सारख्या पशूंची देखभाल, प्रशिक्षण आदि अनेक विषयांवर छोट्या छोट्या चित्रफितीतून गड-किल्ल्यांचे सैनिकी महत्व दर्शवता येईल.

## नौदल-भूदलाच्या कामगिरीचे प्रात्यक्षित

# आपल्याला हे करता येणार नाही का?

- नक्कीच करता येईल...
- पुण्यात एन डी ए, मिलिटरी इंजिनियरिंग कॉलेज, आणि अनेक सेवात आणि निवृत्त सैनिक अधिकाऱ्यांच्या मार्गदर्शनाखाली हे करता येणे सहज शक्य आहे. याची सुरवात झाली की अनेक अन्य भागातही या संकल्पनेतून आणखी कल्पक प्रकल्प हाती घेता येतील.
- सध्याचे सरकार पर्यटनाला प्रोत्साहन देणारे असल्याने देश-विदेशात त्यांच्याकडून ही अशा प्रकल्पाला नक्कीच प्रोत्साहनच मिळेल...
- .... विंग कमांडर शशिकांत ओक (नि)